GR-200404101534418001-0100

प्रलंबित विभागीय चौकशा तात्काळ निकालात काढण्यासाठी नेमलेल्या सेवानिवृत्त चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकारी यांना प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांकः सीडीआर-१९९९/प्र.क्र.७३/९९/११-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः 31/5/2001

**पहाः-** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः सीडीआर-१९९९/प्र.क्र.३२/९९/११-अ, दि. ०१ मार्च, २०००

**परिपत्रक :-**

प्रादेशिक विशेष अधिकारी व जिल्हा चौकशी अधिकारी यांच्याकडील प्रलंबित चौकशी प्रकरणांपैकी जुनी प्रकरणे अन्य सेवानिवृत्त शासकीय अधिकाऱ्याकडे सोपविल्यानंतर मानधनाचे वाटप कोणत्या पध्दतीने करावे व कोणत्या सवलती दयाव्यात या संदर्भात शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दि.१.३.२००० अन्वये सूचना देण्यात आल्या आहेत.

या संदर्भात संबंधित सेवानिवृत्त अधिकाऱ्यांना चौकशीकामी साक्षीपुरावा नोंदविण्यासाठी कराव्या लागणाऱ्या प्रवासासाठी, प्रवासभत्ता तसेच दैनिक भत्ता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर शासनाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने सर्व विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांना पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

चौकशी अधिकारी म्हणून एखादया सेवानिवृत्त अधिकाऱ्याची नेमणूक केल्यानंतर त्या सेवानिवृत्त अधिकाऱ्यास सदर प्रकरण ज्या विभागाने सोपविले आहे, त्या विभागाच्या सचिवांच्या परवानगीने त्यांचेवर सोपविलेल्या कामासंदर्भात बाहेरगावी जावे लागले, तर मुंबई नागरी सेवा नियम १९५५ मधील नियम ५३२ च्या तरतुदीनुसार विशेष कारणे नमूद करुन अशा प्रकरणी त्या अधिकाऱ्यास शासकीय कामकाजासाठी केलेल्या प्रवासाच्या संदर्भात प्रवासभत्ता मंजूर करण्यात यावा. तसेच या प्रवासाच्यावेळी अनुज्ञेय असणारे भत्ते मंजूर करण्यात यावे. या अधिकाऱ्यांना प्रवासभत्ता व दैनिक भत्ता मंजूर करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतुदीनुसार हे भत्ते अदा करण्यात यावे.

हे शासन परिपत्रक वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांकः५०८३/ सेवा ५, दि. २८.२.२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सु.वि.कोळेकर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव,

२. मुख्यमंत्र्यांचे सचिव,

कृ.मा.प.

३. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५. सर्व अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव,
६. सर्व मंत्रालयीन विभाग,
७. मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील इतर सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. सर्व जिल्हाधिकारी,
१०. सर्व प्रादेशिक विशेष अधिकारी, विभागीय चौकशा,
११. सर्व सादरकर्ता अधिकारी, विभागीय चौकशा,
१२. सर्व जिल्हा चौकशी अधिकारी, विभागीय चौकशा,
१३. निवड नस्ती.